**<u>प्रशासकीय मान्यता</u>**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात जिल्हा वार्षिक योजनांतर्गत मंजूर अनुदानातून संस्थेकरिता यंत्र खरेदीस प्रशासकीय मान्यता.

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व अतिविशेषोपचार रुग्णालय, नागपूर

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : जीएसएन-२०१८/प्र.क्र.४१७/प्रशा-१**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक : ०३ जानेवारी,२०१९.

**वाचा :**
१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८.
४) संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र : संवैशिवसं/शावैमवअविरुना/ जिवायो/यंसाख/१९५५३/१-म/२०१८, दिनांक : २९.११.२०१८.
५) संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र : संवैशिवसं/निधी मंजुर झाल्याचे प्रत/यंसाख/२-म/२०४६७/२०१८, दिनांक : १९.१२.२०१८.
६) जिल्हाधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, नागपूर यांचे पत्र क्र. जिनिस/कार्या-३७/जिवायो/का-५/१३९४/२०१८-१९, दिनांक ०६.०८.२०१८.

**<u>शासन निर्णय</u> :-**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व अतिविशेषोपचार रुग्णालय, नागपूर या संस्थेस सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात जिल्हा नियोजन समितीमार्फत जिल्हा वार्षिक योजनांतर्गत यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी तसेच बांधकामाकरिता रुपये ४००.०० लक्ष इतके अनुदान अर्थसंकल्पित करण्यात आलेले आहे. सदर अनुदानातून एकूण रुपये २,४९,०२,७११/- (अक्षरी रुपये दोन कोटी एकोणपन्नास लक्ष दोन हजार सातशे अकरा फक्त) इतक्या रकमेची खालील

तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे यंत्रसामुग्री खरेदी करण्यास या शासननिर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | यंत्राचे नांव | नग | प्रति नग किंमत | एकूण किंमत | प्रशासकीय मान्यतेची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १. | व्हिडिओ एन्डोस्कोपी सिस्टीम कन्सीस्टींग ऑफ ॲडल्ट व्हिडिओ गॅस्ट्रोस्कोप, कोलोनोस्कोप ॲण्ड ड्युओडिनोस्कोप विथ व्हिडिओ प्रोसेसर विथ लाईट सोर्स ॲण्ड मॉनिटर | ०१ | ६५,००,००० | ६५,००,००० | ६५,००,००० |
| २. | व्हिडिओ गॅस्ट्रोस्कोप (ॲडल्ट) | ०१ | १०,००,००० | १०,००,००० | १०,००,००० |
| ३. | इलेक्ट्रिक हाय स्पीड इलेक्ट्रिक न्युरो ड्रिल | ०१ | २०,१९,७०३ | २०,१९,७०३ | २०,१९,७०३ |
| ४. | इलेक्ट्रोसर्जिकल कॉटरी मशीन | ०१ | ५,००,००० | ५,००,००० | ५,००,००० |
| ५. | ॲडव्हान्सड् एचडी लॅप्रोस्कोपी सिस्टीम इन्क्ल्युडींग मॉनिटर्स सीओटू (टेलिस्कोप) सईन्स्फलेट, एलईडी लाईट सोर्स, अलॉंग विथ कॉटरी लॅप्रोस्कोपी इन्स्ट्रुमेन्ट | ०१ | ९६,७३,८७३ | ९६,७३,८७३ | ९६,७३,८७३ |
| ६. | मोटराईज्ड बेड | ०४ | १,४२,०८७ | ५,६८,३४८ | ५,६८,३४८ |
| ७. | कार्डियाक इन्स्ट्रुमेन्टस् (ओपन हार्ट) | ०१ | १६,४१,९६४ | १६,४१,९६४ | १६,४१,९६४ |
| ८. | कॉरोनरी सेट इम्पोर्टेड इन्स्ट्रुमेन्टस् | ०१ | २८,९९,२२३ | २८,९९,२२३ | २८,९९,२२३ |
| ९. | झेनॉन हेड लाईट सोर्स अलॉंग विथ स्टॅण्डर्ड ॲक्सेसरीज | ०१ | ४,९९,८०० | ९,९९,६०० | ९,९९,६०० |
| | **एकूण** | | | **२,४९,०२,७११** | **२,४९,०२,७११** |

**अटी :-**

१. सदर प्रशासकीय मान्यता जिल्हा नियोजन समिती, नागपूर यांच्यामार्फत जिल्हा वार्षिक योजनांतर्गत सदर संस्थेस मंजूर असलेल्या अनुदानातून प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर यंत्रसामुग्री हाताळणीसाठी नव्याने पदनिर्मितीची आवश्यकता नाही, याबाबत संचालनालयाने व संबंधित अधिष्ठाता यांनी खातरजमा करावी.

३. सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

४. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया "औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फामास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत" निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

५. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक (वै.शि.) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

६. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वै.शि.) यांनी प्रमाणित करावे.

७. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

८. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

९. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०.उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

**२.** या प्रयोजनासाठी उपरोक्त तक्यात नमूद केल्यानुसार येणारा यंत्रनिहाय खर्च सदर संस्थेस सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात जिल्हा वार्षिक योजनांतर्गत मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व त्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व अतिविशेषोपचार रुग्णालय, नागपूर

मागणी क्रमांक ओ-६३

| | | |
|---|---|---|
| ४२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| ०३ | - | वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन |
| १०५ | - | विषम चिकित्सा |
| (५५) | - | जिल्हा योजना- नागपूर |
| (५५) (०१) | - | रुग्णालयासाठी यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करणे (४२१० १५११) |
| ५२ | - | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री |

**३.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०३१७२१२२०३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun M. Dahale

Digitally signed by Arun M. Dahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, cn=Arun M. Dahale
Date: 2019.01.03 18:07:37 +05'30'

( अ. मु. डहाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - २ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर.
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि., मुंबई.
३. जिल्हाधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, नागपूर.
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
५. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व अतिविशेषोपचार रुग्णालय, नागपूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
७. निवडनस्ती (प्रशा-१).